राज्य योजना सन २०२१-२२

डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन-वन विकास योजना (२४०६-८७११) या योजनेंतर्गत निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी- ११.२१/प्र.क्र. २९६/फ-१**

मंत्रालय, मुंबई ४०००३२.

दिनांक :- २५ फेब्रुवारी, २०२२.

वाचा :-

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०६.०४.२०२१.
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १४.१०.२०२१
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी- ११.२१/प्र.क्र. २९६/फ-१, दिनांक ३०.१२.२०२१
५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-१/इए/यो/प्र.क्र.०२/२०२१-२२/७५, दिनांक २१.१२.२०२१.
६. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०३.०२.२०२२.
७. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-१/इए/यो/प्र.क्र.०२/२०२१-२२/१४०, दिनांक १४.०२.२०२२.
८. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-२२(६)/यो/प्र.क्र.५३/२९७६/२०२१-२२, दिनांक १८.०२.२०२२.
९. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-२२(६)/यो/प्र.क्र.५२/२०२१-२२/२९८२/२०२१-२२, दिनांक १८.०२.२०२२.

प्रस्तावना :-

सन २०२१-२२ आर्थिक वर्षाकरिता डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन-वन विकास योजना (२४०६-८७११) या लेखाशिर्षाअंतर्गत एकूण रु. १००००.०० लक्ष नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१, २, ३ व ६ चे शासन निर्णयान्वये सन २०२१-२२ मध्ये निधी वितरणाच्या अनुषंगाने मार्गदर्शक सूचना जारी करण्यात आल्या आहेत.

संदर्भ क्रमांक ५, ७, ८ व ९ च्या पत्रान्वये प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन-वन विकास योजना (२४०६-८७११) या योजनेंतर्गत प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केले असून त्या अनुषंगाने शासनाकडुन पुढील निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाचे संदर्भ क्रमांक ६ चा शासन निर्णय विचारात घेता प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ५ व ७ तसेच प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ८ व ९ च्या पत्रान्वये केलेली निधीची मागणी लक्षात घेऊन डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन-वन विकास योजना (२४०६-८७११) या लेखाशिर्षांतर्गत खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे विविध उद्दीष्टान्वये **रु. ५३९.३६ लक्ष** इतका निधी सोबत जोडलेल्या प्रपत्रात नमुद कार्यबाबींवर खालील अटी व शर्तींचे अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:

**(रु. लाखात)**

| उद्दिष्ट शिर्ष | सदर शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचा निधी |
|---|---|
| ०२-मजुरी | ३२३.६२ |
| २१-पुरवठा व सामग्री | २१५.७४ |
| **एकूण** | **५३९.३६** |

i. सदर योजनेवर खर्ची टाकावयाची रक्कम सन २०२१-२२ मध्ये लेखाशिर्ष क्रमांक २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२, पर्यावरणीय वनिकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवांचे संरक्षण, (००) (१८) डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन-वन विकास योजना (२४०६-८७११) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

ii. योजनांतर्गत प्रस्तावीत कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

iii. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेत विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

iv. सदरच्या खर्चाच्या अनुषंगाने आवश्यक असलेले लेखे व्यवस्थित/अचूक ठेवण्याबाबत दक्षता घ्यावी.

v. कार्यबाबींमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पध्दतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.

vi. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०६.०४.२०२१, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १४.१०.२०२१ व वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०३.०२.२०२२ चे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०३.०२.२०२२ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२२५१६३८०३३०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, serialNumber=5712ce2d7a095c22e97ebb8f03c668b12eba1db0dd8e284883b7bd7fa74da65d, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2022.02.25 16:40:07 +05'30'

**(सिध्देश सावर्डेकर)**
**विशेष कार्य अधिकारी**
**महसूल व वन विभाग**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई/पूर्व, नागपूर.
५. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), चंद्रपूर/अमरावती/कोल्हापूर.
६. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती.
७. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, सह्याद्री व्याघ्र प्रकल्प, कोल्हापूर.
८. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर.
९. ब-१, फ-२,फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

शासन निर्णय क्रमांक : डब्ल्युएलपी ११.२१/प्र.क्र. २९६/फ-१, दिनांक : २५.०२.२०२२ सोबतचे प्रपत्र.

| अ.क्र. | वनवृत्त | तपशिल | प्रस्तावित रक्कम. (रु. लाखात) |
|---|---|---|---|
| १ | मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), चंद्रपूर | ब्रम्हपूरी वन विभागातील जंगलालगतचे गावांमध्ये मानव-वन्यजीव संघर्ष उदभवू नये याकरिता उपाययोजना राबविणेसाठी प्रती गाव रु. २५.०० लक्ष प्रमाणे एकुण ६३ गावांकरिता | १५७५.०० |
| २ | मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती. | १ गावाकरीता रु. २५.०० लक्ष प्रमाणे | २५.०० |
| ३ | वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, सह्याद्री व्याघ्र प्रकल्प, कोल्हापूर. | ७ गावांकरीता रु. २५.०० लक्ष प्रमाणे | १७५.०० |
| ४ | मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) , अमरावती. | मोर्शी वनपरिक्षेत्रांतर्गत लोखंडी जाळीचे कुंपण करणे. | ३५.१९ |
| ५ | मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) , कोल्हापूर. | ९ गावांकरीता रु. २५.०० लक्ष प्रमाणे | २२५.०० |
| | | **एकूण एकंदर** | **२०३५.१९** |

*****